मुंबई पोलीस अधिनियम १९५१ व महाराष्ट्र चित्रपटगृहे [विनियमन] नियम १९६६ अन्वये देण्यात येणाऱ्या परवान्याबाबत करावयाची कारवाई.

महाराष्ट्र शासन,

गृह विभाग

शासन निर्णय क्र. एमआयएस ०१९९/२२/वि.शा.५

मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक : ५ जानेवारी २०००

शासन निर्णय :- जनतेची कामे अधिक कार्यक्षमतेने व उत्तम प्रकारे होण्याकरीता तसेच शासनाची व शासकीय अधिकारी, कर्मचारी यांची जनमाणसामध्ये प्रतिमा उंचावण्याकरीता शासन अधिक कार्यक्षम व पारदर्शक होणे आवश्यक आहे. त्याकरीता जनतेची कामे विहित कालावधीत करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे त्यानुसार आपल्या कार्यालयाकडून देण्यात येणारा ध्वनिवर्धक परवाना, खाद्यगृह [हॉटेल] परवाना, लॉज परवाना, सार्वजनीक ठिकाणी करमणूकीसाठी जागेचा परवाना, कार्यक्रमासाठी तात्पुरत्या स्वरूपाच्या जागेचा परवाना, हॉटेल आस्थापनांना मनोरंजनासाठी परवाना, व्हिडीओ पार्लर, अम्युझमेंट पार्लर इत्यादींना परवाने चित्रपटगृह परवाना, ध्वनीवर्धक ठेकेदार व्यवसायाचा परवाना, चित्रपटगृहाच्या जागेच्या परवान्याचे नुतनीकरण तसेच चित्रपटगृहाच्या बांधकामाबाबत ना हरकत प्रमाणपत्र देण्याबाबत कोणकोणत्या कागदपत्राची आवश्यकता आहे याची माहिती सिटीझन चार्टरमध्ये नमूद करावी व असे अर्ज प्राप्त झाल्यानंतर परवाने देण्याबाबत पुढीलप्रमाणे विहित कालावधीत कार्यवाही पूर्ण करावी .

१] ध्वनीवर्धक परवाना : जनतेकडून अथवा संस्था, महामंडळाकडून ध्वनिवर्धक परवान्यासाठी संबंधीत पोलीस ठाण्याच्या प्रभारी अधिकाऱ्याकडे अर्ज प्राप्त झाल्यावर त्याबाबत त्यांनी मुंबई पोलीस अधिनियम १९५१ च्या कलम १६२ अनुसार योग्य त्या अटी, शर्ती व ऐसे बंधन घालून कार्यक्रम सुरु होण्यापुर्वी निर्णय घ्यावा.

२] खाद्यगृह [हॉटेल] परवाना : खाद्यगृह परवाना मिळण्यासाठी जनतेकडून विहित नमुन्यात अर्ज प्राप्त झाल्यावर ग्रामीण भागामध्ये जिल्हादंडाधिकारी तर आयुक्तालयाच्या ठिकाणी पोलीस आयुक्त यांनी अर्जदाराने परवान्यासाठी लागणाऱ्या अटी व शर्तीची पूर्तता केल्यावर त्यास परवाना देण्याबाबत ३० दिवसाच्या आत निर्णय घ्यावा.

३] लॉज परवाना :- लॉज परवाना मिळण्यासाठी जनतेकडून विहित नमुन्यात अर्ज प्राप्त झाल्यावर ग्रामीण भागामध्ये जिल्हादंडाधिकारी तर आयुक्तालयाच्या ठिकाणी पोलीस आयुक्त यांनी अर्जदाराने परवान्यासाठी लागणाऱ्या अटी व शर्तींची पूर्तता केल्यावर त्यास परवाना देण्याबाबत ३० दिवसांच्या आत निर्णय घ्यावा.

४] सार्वजनिक ठिकाणी करमणुकीसाठी जागेचा परवाना : अर्जदारास एफएल-३ परवाना व आरोग्य खात्याचा परवाना मंजूर होताच अर्जदाराने जिल्हादंडाधिकारी वा पोलीस आयुक्त यांच्याकडे अशा परवान्यासाठी अर्ज केल्यास अर्ज केल्याच्या दिवसापासून ३ दिवसात सदर परवाना मंजूर करण्यात यावा. मात्र यासाठी अर्जदाराची जागा व अर्जदाराचा चारित्र्य पडताळणी अहवाल अनुकूल असावा.

५] कार्यक्रमासाठी तात्पुरत्या स्वरूपाच्या जागेचा परवाना : अर्जदाराने जिल्हादंडाधिकारी/पोलीस आयुक्त यांना अर्ज केल्यानंतर व याबाबतचा अहवाल स्थानीक पोलीसांकडून प्राप्त झाल्यावर अशा परवाना एक दिवसात मंजूर करण्यात यावा.

६] हॉटेल आस्थापनांना मनोरंजनासाठी परवाना : अर्जदाराने जिल्हादंडाधिकारी/पोलीस आयुक्त यांच्याकडे अर्ज केल्यानंतर व हा परवाना मिळण्यासाठी आवश्यक असणाऱ्या सर्व कागदपत्रांची पूर्तता केल्यानंतर तसेच याबाबतचे आवश्यक अहवाल संबंधिताकडून प्राप्त झाल्यानंतर अर्जदारास परवाना मंजूर करणे वा नाकारण्याबाबत ७ दिवसात निर्णय घ्यावा.

७] व्हिडीओ पार्लर, ॲम्युझमेंट पार्लर, पूल पार्लर, सायबर कॅफे इत्यादींना परवाने अर्जदाराने यासाठी अर्ज केल्यावर व त्यासाठी आवश्यक असणाऱ्या कागदपत्रांची पूर्तता केल्यावर तसेच त्याबाबतचा अहवाल स्थानीक पोलीस ठाणे व वाहतूक शाखेकडून १५ दिवसात प्राप्त करून घेण्यात यावा व त्यानंतर परवाना देण्याबाबतचा निर्णय ४ दिवसात घेण्यात यावा असे परवाने देण्यास ग्रामीण भागात जिल्हादंडाधिकारी तर आयुक्तालयाच्या ठिकाणी पोलीस आयुक्त हे परवाना अधिकारी आहेत.

८] चित्रपटगृह परवाना : अर्जदाराने चित्रपटगृह बांधण्यासाठीची परवानगी व ना हरकत प्रमाणपत्र मिळाल्यानंतर चित्रपटगृह बांधून पूर्ण झाल्यानंतर महाराष्ट्र चित्रपटगृहे [विनियमन] नियम १९६६ मधील नियम १०० मधील कागदपत्रांची पूर्तता केल्यानंतर व असा परवाना देण्यास शासनाने पूर्व परवानगी दिल्यानंतर संबंधिताला परवाना देण्याबाबत जिल्हादंडाधिकारी/पोलीस आयुक्त यांनी आपापल्या क्षेत्रात ७ दिवसाच्या आत निर्णय घ्यावा.

९] ध्वनिक्षेपक ठेकेदार व्यवसायाचा परवाना : स्थानिक पोलीस ठाण्याकडून अहवाल प्राप्त होताच सदर परवाना देण्यात येतो. अर्ज आल्यावर एक महिन्याच्या आत परवानगी देण्यात येईल. असा परवाना देण्यास ग्रामीण भागात जिल्हादंडाधिकारी तर आयुक्तालयाच्या ठिकाणी सहाय्यक पोलीस आयुक्त हे परवाना अधिकारी आहेत.

१०] चित्रपटगृहाच्या जागेच्या परवान्याचे नुतनीकरण : अर्जदाराने नुतनीकरणासाठी आवश्यक असणाऱ्या कागदपत्रांची, पूर्तता केल्यावर व स्थानिक पोलीसांचा अहवाल प्राप्त झाल्यावर जिल्हादंडाधिकारी/पोलीस आयुक्त यांनी दोन दिवसात परवाना नुतनीकरणाचा निर्णय घ्यावा. स्थानिक पोलीसांनी अहवाल १५ दिवसात सादर करावा.

## ना-हरकत प्रमाणपत्रे

१] चित्रपटगृहाच्या बांधकामाबाबत ना हरकत प्रमाणपत्र : याबाबतचा अर्ज जिल्हादंडाधिकारी/पोलीस आयुक्त यांच्याकडे प्राप्त झाल्यावर संबंधित खात्याकडून मिळणारी ना हरकत प्रमाणपत्रे मिळाल्यानंतर शासनाकडे प्रस्ताव सादर करावा. शासनाकडून पूर्व परवानगी मिळाल्यानंतर ७ दिवसाच्या आत ना हरकत प्रमाणपत्र देण्याची कार्यवाही करावी.
संबंधित खात्याने ना हरकत प्रमाणपत्र देण्याचा निर्णय १५ दिवसात घ्यावा.

उपरोक्त परवाने व ना हरकत प्रमाणपत्रे देण्याबाबतची कार्यवाही वर नमूद केल्याप्रमाणे विहित कालावधीत पूर्ण करण्याबाबत संबंधितांनी योग्य ती दक्षता घ्यावी. तसेच सदर विहित कालावधी नागरीकांना माहित होण्याकरीता सिटीझन चार्टर मध्ये सुध्दा नमूद करण्यात यावा.

वितुप्रभु

[ वि. तु. प्रभु ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हादंडाधिकारी
सर्व पोलीस अधिक्षक.